ॐ

# रयणसार.

णमिऊण वड्ढमाणं, परमप्पाणं जिणं तिसुद्देण ॥
वोच्छामि रयणसारं सायारणयारधम्मीणम् ॥ १ ॥

अर्थ— परमात्मा जो श्रीवर्द्धमान जिनेश्वर; त्यास मनवचनकायेच्या शुद्धीनें नमस्कार करून; सागार आणि अनगार धर्मीयांस 'सम्यग्दर्शनज्ञानचारित्ररूपी' रत्नांचा सारांश सांगतों.

पुव्वं जिणेहि भणियं, जहट्ठियं गणहरेहि वित्थरियं ॥
पुव्वाइरियक्कमजं, तं बोल्लइ जोहु सद्दिट्ठी ॥ २ ॥

अर्थ प्रथम जिनांनी ज्याचा उपदेश केला आहे, आणि त्या उपदेशानुसार गणधरांनी यथास्थितपणें ज्याचा विस्तार केला आहे; आणि पूर्वाचार्यपरंपरेनें जो चालत आला आहे; अशा जिनधर्मावर ज्याची श्रद्धा आहे तो सम्यग्दृष्टि होय.

मदिसुदणाणबळेण दु, सच्छंदं बोल्लइ जिणुद्दिट्ठं ॥
जो सो होइ कुदिट्ठी, ण होइ जिणमग्गलग्गरवो ॥ ३ ॥

अर्थ- बुद्धिप्रभावानें पुष्कळ शास्त्र वाचूनहि आपल्या सत्स्वरूपास न जाणतां स्वच्छंदपणें जो वागतो. अर्थात् जिनानें सांगितलेला मोक्षप्राप्तीचा जो उपाय; त्याजवर ज्याची श्रद्धा नाही, तो मिथ्यादृष्टि होय.

सम्मत्तरयणसारं मोक्खमहारुक्खमूलमिदि भणियं ॥
तं जाणिज्जऊ णिच्छयववहारसरूव दो भेयं ॥ ४ ॥

अर्थ— मोक्षरूपी महावृक्षाचें बीज जें सम्यग्दर्शन, तें निश्चय आणि व्यवहार स्वरूपानें दोन प्रकारचें आहे. " प्रशम ( रागद्वेषमोहादि-

कांचा उपशम ), संवेग ( संसाराची भीति बाळगणें ), अनुकंपा ( प्राणिमात्रांवर दयाकरणें ), आस्तिक्य ( जिनधर्मावर विश्वास ) इत्यादिगुणांनीं युक्त जी देवगुरुशास्त्राविषयीं भक्ति; तें व्यवहार सम्यग्दर्शन; आणि आत्म्याची विशुद्धि हें निश्चय सम्यग्दर्शन होय. "

**भयवसणमलविवज्जी संसारसरीरभोगणिव्विण्णो ॥**
**अट्ठगुणंगसमग्गो दंसणसुद्धो य पंचगुरुभत्तो ॥ ५ ॥**

अर्थ— इहलोकभय, परलोकभय, राजभय, चोरभय मरणभय, दुःखभय इत्यादि सात प्रकारचें भय, आणि जुगार, मांसभक्षण. मद्यपान वेश्यासंग, चोरी, शिकार, परस्त्रीहरण, हीं सात व्यसनें ज्यानें सोडिलीं आहेत, जो संसार व शरीरभोगास कंटाळलेला आहे. निःशंका ( मोठ्या संकटांत सुद्धां जिनाविषयीं संशय न बाळगणें ) निष्कांक्षा ( ऐहिकसुखाविषयीं उदास रहाणें ), निर्विचिकित्सता ( जिनधर्मांत अमुक एक क्रिया वाईट आहे वगैरे न ह्मणणें ), अमूढदृष्टित्व ( मिथ्यादृष्टीनें केलेल चमत्कार पाहून मोहवश न होणें ), उपगूहन (सधर्मी श्रावक किंवा यति ह्यांचे दोष झांकणें), स्थितीकरण ( धर्मभ्रष्टास उपदेश करून पुनः धर्ममार्गीं लावणें ), वात्सल्य ( सधर्मिजनांचा यथायोग्य सत्कार करून प्रीति करणें ), मार्गप्रभावना ( पूजा, महोत्सव, व्याख्यान, तप वगैरे उपायांनीं जिनधर्माचा महिमा प्रकट करणें ), इत्यादि सम्यग्दर्शनाचीं जीं आठ अंगें; हीं ज्यानें धारण करून, पंचगुरूविषयीं दृढभक्ति ठेविली आहे तो सम्यक्त्वशुद्ध होय.

**णियसुद्धप्पणुरत्तो बहिरप्पावत्थवज्जियो णाणी ॥**
**जिणमुणिधम्मं मण्णइ गयदुक्खो होइ सद्दिट्ठी ॥ ६ ॥**

अर्थ— बहिरात्म्याची अवस्था (पंचेंद्रियविषयोपभोगादिसेवन) सोडून, जो आपल्या शुद्धात्मस्वरूपाच्या प्राप्तीविषयीं खटपट करीत आहे; तो सम्य-

ग्दृष्टि सर्व दुःखापासून मुक्त होणार.

**मयमूढमणायतणं संकाइवसणभयमईयारं ॥**
**जेसिं चउदालेदे ण संति ते होंति सद्दिट्ठी ॥ ७ ॥**

अर्थ— ज्ञान, श्रेष्ठपणा. कुल, जाति, बळ, ऐश्वर्य, तप, सुंदरकाया इत्यादि आठ गुणांविषयी मद (गर्व) करणें; लोकमूढ (संक्रांतिदान, ग्रहणस्नान. गाईस नमस्कार, शस्त्रपूजा, पर्वतावरून उडी मारून जीव देणें, जलसमाधि करणें, नवस करणें इत्यादि), देवमूढ (बलि मागणाऱ्या देवांस भजणें). पाषंडिमूढ (पाखंडी बैरागी वगैरेची भक्ति करणें,) ह्या तीन मूढता; मिथ्यादर्शन. मिथ्याज्ञान. मिथ्याचारित्र आणि मिथ्यात्वी, मिथ्याज्ञानी व मिथ्याचारित्री यांची सेवा करणें हे सहा अनायतन, आठ शंकादिक दोष (पांचव्या गाथेंत सांगितलेल्या आठ अंगांच्या उलट) सात व्यसनें, भय आणि शंकाकांक्षादि पांच अतिचार, हे सर्व मिळून चवेचाळीस दोष ज्यास नाहीत, तो सम्यग्दृष्टि होय.

**देवगुरुसमयभत्ता संसारसरीरभोगपरिचत्ता ॥**
**रयणत्तयसंजुत्ता ते मणुया सिवसुहं पत्ता ॥ ८ ॥**

अर्थ — देव. गुरु. शास्त्रांची भक्ति करणार. संसार, शरीर, विषयोपभोग सोडणार, आणि सम्यग्दर्शनज्ञानचारित्र पाळणार, जे मनुष्य; ते मोक्षास जाण्यास योग्य होत.

**दाणं पूजा सीलं उववासं बहुविहं पि खवणंपि ॥**
**सम्मजुदं मोक्खसुहं सम्मविणा दीहसंसारा ॥ ९ ॥**

अर्थ सत्पात्रदान, जिनपूजा. शील, उपवास, नानाप्रकारचीं व्रतोद्यापनें ही सर्व सम्यक्त्वपूर्वक केल्यास क्रमानें मोक्षप्राप्ति होते. सम्यक्त्वाशिवाय या क्रिया निष्फळ होऊन, शेवटी दीर्घ संसार आहे तो आहेच.

**दाणं पूजामुक्खं सावयधम्मो ण सावगो तेण विणा ॥**
**झाणज्झयणं मुक्खं जइधम्मे तं विणा तहा सोवि ॥ १० ॥**

अर्थ— सत्पात्रांस दान देणें व जिनपूजा करणें हा श्रावकाचा मुख्य धर्म; आणि ध्यानाध्ययन करणें हा मुनीचा मुख्य धर्म होय. त्यांशिवाय त्यांस श्रावक किंवा यति ह्मणतां येणार नाहीं.

**दाणु ण धम्मु ण चागु ण भोगुण बहिरप्प जो पयंगो सो ॥**
**लोहकसायग्गिमुहे पडियो मरियो ण संदेहो ॥ ११ ॥**

अर्थ— सत्पात्रदान, उत्तमक्षमादिदशधर्म, पंचपातकत्याग, विषयोपभोगत्याग इत्यादि शुभकर्मे न करणारा बहिरात्मारूपी पतंग लोभकषायरूपी अग्नीमध्यें पडून मरणार. यांत संशय नाहीं.

**जिणपूजा मुणिदाणं करेइ जो देहसत्तिरूवेण ॥**
**सम्माइट्ठी सावयधम्मी सो होइ मोक्खमग्गरवो ॥ १२ ॥**

अर्थ— जो सम्यग्दृष्टि श्रावक स्वशक्त्यनुरूप जिनपूजा आणि सत्पात्रदान करितो; तो कालेंकरून मोक्षमार्गांत रत होणार.

**पूजाफलेण तिलोकेसरपूज्जो हवेइ सुद्धमणो ॥**
**दाणफलेण तिलोये सारसुहं भुंजदे णियदं ॥ १३ ॥**

अर्थ— जो श्रावक शुद्धमनानें जिनपूजा आणि सत्पात्रदान करितो. तो क्रमानें तीन लोकांतील इंद्रांस पूज्य आणि त्रैलोक्यांत श्रेष्ठ असें सुख भोगितो. यांत संशय नाहीं.

**दाणं भोयणमेत्तं देण्णइ धण्णो हवेइ सायारो ॥**
**पत्तापत्तविसेसं सदंसणे किं वियारेण ॥ १४ ॥**

अर्थ— पात्रापात्राचा विचार न करितां नुसतें आहारदानही देणारा गृहस्थ मोठा धन्य होय. मग सम्यग्दृष्टीविषयीं काय विचारावें?

**देण्णइ सुपत्त दाणं विसेसदो होइ भोयसग्गमही ॥**

**णिव्वाणसुहं कमसो णिद्दिट्ठं जिणवरिंदेहिं ॥ १५ ॥**

अर्थ— चार दानांपैकीं फक्त आहारदान जरी सत्पात्रास दिलें, तर त्यापासून प्रथम भोगभूमि, नंतर स्वर्गभूमि आणि मग क्रमानें मोक्षही प्राप्त होतो. असें जिनेश्वरांनीं सांगितलें आहे.

**इह णियसुवित्तबीयं जो ववइ जिणुत्तसत्तखेत्तेसु ॥**
**सो तिहुवणरज्जफळं भुंजइ कल्लाणपंचफळं ॥ १६ ॥**

अर्थ— जिनबिंब, जिनचैत्यालय, प्रतिष्ठा, नंदीश्वरादिपूजा, तीर्थयात्रा, सत्पात्रदान आणि जिनशास्त्रलेखन या सात प्रकारच्या शुभ कृत्यांकडे जो आपण न्यायानें मिळविलेल्या द्रव्याचा व्यय करितो; तो तीर्थंकर पदवीप्रत पोंचतो.

**खेत्तविसेसे काले वविय सुबीयं फलं जहा विउळं ॥**
**होइ तहा तज्जाणउ पत्तविसेसे सुदाणफळं ॥ १७ ॥**

अर्थ — उत्तम भूमींत योग्यकाळीं ( घात पाहून ) बीं पेरिलें असतां त्यापासून जसें विपुल फल प्राप्त होतें, त्याप्रमाणें उत्तमपात्रास योग्यकाळीं ( जरूर लागते त्यावेळीं ) दान दिलें असतां भोगभूम्यादिक फळ प्राप्त होतें.

**मादुपिदुपुत्तमित्तं कलत्तधणधण्णवत्थुवाहणविहवं ॥**
**संसारसारसोक्खं सव्वं जाणउ सुपत्तदाणफलं ॥ १८ ॥**

अर्थ— आई, बाप, सद्गुणीपुत्र, हितकर्ता मित्र, सुंदरी व गुणवती भार्या, धन, धान्य, सुखोपभोगाच्या वस्तु वाहन वगैरे, व संसारांतील सुखें सत्पात्रदानाचीं फळें होत.

**सत्तंगरज्ज णवणिहि भंडार सडंग बळ चोद्दहरयणं ॥**
**छण्णवुदिसहस्सित्थीविहवं जाणउ सुपत्तदाणफळं ॥ १९ ॥**

अर्थ— सप्तांगराज्य, नवनिधिभंडार, षडंगबळ, चौदा रत्नें, शाण्णव

न करितां संग्रह केला म्हणून मोठें ऐश्वर्यही प्राप्त होत नाहीं. दरिद्री किंवा श्रीमंत होणें हें पूर्वजन्माच्या पापपुण्याचें फल आहे.

**धणधण्णाइसमिद्धे सुहं जहाहोइ सव्वजीवाणं ॥**
**मुणिदाणाइ समिद्धे सुहं तहा तं विणा दुक्खं ॥२९॥**

अर्थ— धनधान्यांची समृद्धि असल्यामुळें त्यापासून सर्वजीवांस जें सुख मिळतें, तें सत्पात्रदानाचेंच फळ होय. अन्यथा दुःखच होणार.

**पत्तविणा दाणं च सुपुत्तविण बहुधणं महाखत्तं ॥**
**चित्तविणा वयगुण चारित्तं णिक्कारणं जाणं ॥ ३० ॥**

अर्थ— सत्पुत्राशिवाय पुष्कळ संपत्ति, शेत, मळा वगैरे जसें व्यर्थ; सम्यक्त्वावांचून व्रत, गुण, शील, चारित्र हीं जशीं निष्फळ, तसेंच सत्पात्राशिवाय इतर ठिकाणीं दिलेलें दान व्यर्थ होय.

**जिण्णुद्धारपदिट्ठा जिणपूजातित्थवंदण विसयधणं ॥**
**जो भुंजइ सो भुंजइ जिणुद्दिट्ठं णिरयगइ दुक्खं ॥ ३१ ॥**

अर्थ— जिनमंदिरादिकांचा जीर्णोद्धार, जिनपूजा, तीर्थवंदना इत्यादि कृत्याकरितां ठेविलेलें द्रव्य, जो मनुष्य स्वतःच्या प्रपंचाकडे खर्च करितो; तो खरोखर नरकासच जाणार.

**पुत्तकळत्तविदूरो दारिद्दो पंगुमूकबहिरंधो ॥**
**चांडाळाइकुजादो पूजादाणाइदव्वहरो ॥ ३२ ॥**

अर्थ— जिनपूजा, सत्पात्र दान वगैरे धर्मकृत्याकरितां ठेविलेलें द्रव्य; जो हरण करील, तो आंधळा, पांगळा, मुका, बहिरा व पुत्रकलत्रविहीन असा होईल. व चांडालादिक नीच कुलांत जन्म घेईल.

**काय खुट्ट मूळ मूळो लोय भगंदर जळोदरक्खिसिरो ॥**
**सीदुण्हबह्मराइ पूजादाणंतरायकम्मफळं ॥ ३३ ॥**

अर्थ— क्षय, कुष्ट, मूळव्याधि, उदर, मस्तकशूल, लोह, भगंदर,

जलोदर, नेत्ररोग, भूतपिशाचयोनींत जन्म इत्यादि सर्व दुःखें पूजा दानास विघ्न केलेल्या कर्मांचीं फळें होत. याकरितां धर्मकृत्यांस विघ्न आणूं नये.

**सम्मविसोही तवगुणचरित्तसण्णाणदाणपरिहीणं ॥**
**भरहे दुस्समयाळे मणुयाणं जायदे णियदं ॥ ३४ ॥**

अर्थ— क्षायिकसम्यक्त्व, तप, मूलगुण, उत्तरगुण, चारित्र, सज्ञान, दान, पूजा वगैरे शुभ कृत्यें हीं पंचमकालीं भरतक्षेत्रांतील मनुष्यांच्या हातून घडणार नाहींत.

**णहि दाणं णहि पूजा णहि सीळं णहि गुणं ण चारित्तं ॥**
**जइ जइण भणियाते णेरयिया होंति कुमाणुसा तिरया ॥३५॥**

अर्थ— सत्पात्रदान, जिनपूजा, सप्तविधशील ( तीन गुणव्रतें चार शिक्षाव्रतें ) मूलगुण आठ. उत्तरगुण बारा, व्रतें, सदाचरण हीं ज्यांनीं आचरलीं नाहींत; ते नरक किंवा तिर्यंच अगर कुमानुष्य गतीस जाणारे होत.

**लौइयजणसंगादो होइ महामुहुरकुटिळदुब्भावो ॥**
**तह्मा लोइयसंगं जोई तिविहेण मुंचाहो ॥ ३६ ॥**

अर्थ— हे यते; हे प्रापंचिक लोक प्रायशः मोठे मूर्ख व कुटिल स्वभावाचे असतात; याकरितां यांची संगति सोड! आणि निर्जन अरण्यांत एकांत स्थळीं वास कर कारण, यांच्या संगतीनें तुलाही वाईट गुण लागतील.

**ण विजाणइ कज्जमकज्जं सेयमसेयं च पुण्णपावं हि ॥**
**तच्चमतच्चं धम्ममधम्मं सो सम्मउम्मुक्को ॥ ३७ ॥**

अर्थ— हे साधो; हे संसारी जन प्रायशः मोहामुळें हिताहित, कार्याकार्य, सेव्यासेव्य, पुण्यपाप, तत्वातत्व, धर्माधर्म वगैरे काहींएक जाणत

नाहींत. हे मिथ्यात्वी आहेत. ह्मणून यांचा सहवास तुला नको.

**ण विजाणइ जोग्गमजोग्गं णिच्चमणिच्चं हेयमुवदेयं ॥**
**सच्चमसच्चं भव्वमभव्वं सो सम्मउम्मुक्को ॥ ३८ ॥**

अर्थ— हे साधो, सम्यक्त्वास विमुख असलेला हा संसारी जन योग्य अयोग्य, नित्य, अनित्य, हेय, उपादेय, सत्य, असत्य, भव्य अभव्य, बरें, वाईट वगैरे कांहींएक जाणत नाहीं. यास्तव त्यांचा सहवास सोडून दे.

**उग्गो तिव्वो दुट्ठो दुब्भावो दुस्सुदो दुरालोवो ॥**
**दुम्मदरवो विरुद्दो सो जीवो सम्मविमुक्को ॥ ३९ ॥**

अर्थ— उग्र, रागीट, दुष्ट, आर्तरौद्रध्यान करणारा, स्त्रीकथा, राजकथा वगैरे ऐकण्यांत तत्पर, मिथ्यामार्गानें चालणारा, गर्व करणारा, असा जो मानव त्यास सम्यक्त्वाची प्राप्ति होणें कठीण.

**खुद्दो रुद्दो रुट्टो अणिट्ठपिसुणो सगब्भियो सूयो ॥**
**गायणजायणबंडणदूसणसीलो सम्मउम्मुक्को ॥ ४० ॥**

अर्थ— क्षुद्र, रुद्र, रागीट, अनिष्ट चिंतन करणारा, खल, मत्सरी, बीभत्सगान, वादन, नकला, निंदा करणारा, असा जो मनुष्य तो मिथ्यात्वी होय.

**वाणरगद्दहसाणगयवग्गहवराहकराहा ॥**
**पक्खिजलूयसहावणरा जिणवरधम्मुविणासु ॥ ४१ ॥**

अर्थ— वानर, गर्दभ, श्वान, हत्ती, वाघ, डुकर, कोल्हा, पक्षी, जळवा यांच्या सारख्या स्वभावाचे लोक जिनधर्माचे विनाशक होत.

**सम्मविणा सण्णाणं, सच्चारित्तं ण होइ णियमेण ॥**
**तो रयणत्तयमज्झे सम्मगुणमुक्किट्ठमिदि जिणभणिदं ॥ ४२ ॥**

अर्थ— प्रथम सम्यग्दर्शन प्राप्त झाल्याशिवाय सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र हीं प्राप्त होत नाहींत. ह्मणून सम्यग्दर्शनज्ञानचारित्र या तीहींमध्यें

सम्यग्दर्शन हें श्रेष्ठ होय. असें जिनानें सांगितलें आहे.

**तणुकुट्टे कुळभग्गं, कुणइ जहा मिच्छमप्पणो त्ति तहा ॥**
**दाणाइ सुगुणभग्गं गइभग्गं मिच्छमेव हो कट्टं ॥ ४३ ॥**

अर्थ -- कुष्टव्याधि जडला म्हणजे जसा कुलाचा नाश होतो; त्या प्रमाणेंच जीव मिथ्यात्वी ( नास्तिक ) झाला म्हणजे दान, सद्गुण, सद्गति इत्यादिकांचा नाश होतो. म्हणून मिथ्यात्व हें मोठें कष्टच होय.

**देवगुरुधम्मगुणचारित्तंतवयारमोक्खगइभेयं ॥**
**जिणवयणसुदिट्ठिविणा दीसइ किं जाणए सम्मं ॥ ४४ ॥**

अर्थ— जिनवचनावर श्रद्धान असल्याशिवाय देव, गुरु, धर्म, शास्त्र, चारित्र, तप, आचार, मोक्षगति इत्यादि गोष्टींचें ज्ञान होणार नाही. आतां तीन प्रकारच्या आत्म्यांपैकीं बहिरात्म्याचें स्वरूप सांगतात.

**एक्कु खणं ण विचिंतइ मोक्खणिमित्तं णियप्पसब्भावं ॥**
**अणिसं विचित्तयावं बहुलालावं मणे विचिंतेइ ॥ ४५ ॥**

अर्थ -- जो संसारापासून मुक्त होण्याकरितां परमात्मस्वरूपाचिंतन एक क्षण देखील करीत नाहीं; आणि निरंतर ज्याच्या मनामध्यें पापमय अनेक विचार घोळत असतात, तो प्राणी बहिरात्मा होय.

**मिच्छामइमयमोहासवमत्तोबोल्लये जहा भल्लो ॥**
**तेण ण जाणइ अप्पा अप्पाणं सम्मभावाणं ॥ ४६ ॥**

अर्थ— मोहनीयकर्मरूपी मद्य पिऊन उन्मत्त झालेला; आणि म्हणूनच मिथ्यात्वी असा बहिरात्मा मूर्खाप्रमाणें ( संसाराच्या गोष्टी ) बरळत असतो. त्याला निजशुद्धात्म्याची ओळख होत नाहीं.

**पुव्वठियं खवइ कम्मं पविसदु णादेइ अहिणवं कम्मं ॥**
**इहपरलोयमहप्पं देइ तहा उवसमो भावो ॥ ४७ ॥**

अर्थ— या आत्म्यानें उपशांतभाव स्वीकारिला म्हणजे त्यापासून क्रमाक्रमानें संचित कर्माचा नाश होतो. आणि नवीन कर्म घडत नाहीं. तेणेंकरून अन्यजन्मीं मोठें ऐश्वर्य ( ज्ञान धनादि ) प्राप्त होतें.

**अज्ज विसप्पिणि भरहे पउरा रुद्दट्टझाणया दिठ्ठा ॥**
**णठ्ठा दिठ्ठा कठ्ठा पाविठ्ठा किण्णणीलकावोदा ॥ ४८ ॥**

अर्थ— या पंचमकाळीं भरतक्षेत्रांत आर्त्त (इच्छेप्रमाणें घडत नसल्याबद्दल खेद करणें ) रौद्र ( दुसऱ्यांचें वाईट चिंतन करणें ) अशा या दोन ध्यानाचे आणि नष्ट, दुष्ट, पापिष्ट. कृष्ण नील व कापोत या तीन लेश्या असणारे असेच जीव पुष्कळ दृष्टीस पडतात.

**अवसप्पिणि भरहे पंचमयाले मिच्छपुव्वया सुलहा ॥**
**सम्मत्तपुव्वसायारणयारा दुल्लहा होंति ॥ ४९ ॥**

अर्थ— या पंचमकालांत भरतक्षेत्रामध्यें जिकडेतिकडे मिथ्यात्वी जीव पुष्कळ. सम्यक्त्वपूर्वक आचरण करणारे श्रावक व यतिही दुर्लभच समजा.

**असुहादो णिरयाऊ सुहभावादो दु सग्गसुहमाऊ ॥**
**दुहसुहभावं जाणइ जं ते रुच्चेइ तं कुज्जा ॥ ५० ॥**

अर्थ— सम्यग्दर्शनानें स्वर्गसुख आणि मिथ्यात्वानें नरकदुःख प्राप्त होतें. हे दोन्ही भाव जाणून यांतून तुला आवडेल त्या भावाचा स्वीकार कर.

**हिंसाइसु कोहाइसु मिच्छाणाणेसु पक्खपाएसु ॥**
**मच्छरिएसु मएसु दुरहिणिवेसेसु असुहलेसेसु ॥ ५१ ॥**
**विकहाइसु रुद्दट्टज्झाणेसु असूयगेसु दंडेसु ॥**
**सल्लेसु गारवेसु खाइसु जो वट्टदे असुहभावो ॥ ५२ ॥**

अर्थ— जीवहिंसा, क्रोध, मान, माया, लोभ, मिथ्याज्ञान, गुणद्वेष,

मत्सर, आठ मद, दुरभिमान, कृष्णनीलकापोतादि कुलेश्यायुक्त परिणाम, विकथा, आर्तरौद्रध्यान, अनर्थदंड, मिथ्या, माया, निदान ( मला अमुक एकप्रकारचें सुख मिळावें या हेतूनें तप करणें. ) ख्याति, लाभ, सन्मान इत्यादिकांची वांछा करणें यांस दुर्भाव ह्मणतात.

**दव्वत्थिकायछप्पणतच्चपयत्थेसु सत्तणवगेसु ॥**
**बंधणमोक्खे तक्कारणरूवे बारसणुप्पेक्खे ॥ ५३ ॥**
**रयणत्तयस्स रूवे अज्जाकम्मे दयाइसद्धम्मे ॥**
**इच्चेवमाइगं जो वट्टइ सो होइ सुह भावो ॥ ५४ ॥**

अर्थ— जीव, धर्म, अधर्म, काल, आकाश, पुद्गल हीं सहा द्रव्यें; आणि पंच अस्तिकाय; व जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर, निर्जरा, मोक्ष हीं सात तत्वें व पुण्य पाप मिळून नऊ पदार्थ, यांविषयीं श्रद्धान; बंधमोक्षाचीं कारणें; बारा अनुप्रेक्षांची भावना, रत्नत्रयरूप जैनधर्म, आर्यसंमत दयाधर्म इत्यादि पुण्य कृत्यें करण्याचा प्रयत्न करणें यास शुभ भाव ह्मणतात. या भावानें स्वर्गसुख प्राप्त होतें.

**धरियउ बाहिरलिंगं, परिहरियउ बाहिरक्खसोक्खंवि ॥**
**करियउ किरिया कम्मं, मरियउ जम्मियउ बहिरप्पजीवो ॥५५॥**

अर्थ— बहिरात्मा जीव बाह्यलिंग धारण करितो, बाह्येंद्रियसुखाचा त्याग करितो, बाह्य क्रिया करितो. पण त्यायोगानें त्याचें जन्ममरण चुकत नाहीं.

**मोक्खणिमित्तं दुक्खं, वहेइ परलोय दिट्ठि तणुदंडं ॥**
**मिच्छाभाउ ण छिज्जइ, किं पावइ मोक्ख सोक्खं हि ॥५६॥**

अर्थ— कित्येक मूर्ख लोक मिथ्याभाव तसाच कायम ठेऊन, मोक्षा करितां पुष्कळ कष्ट भोगतात. परलोक सुखाच्या आशेनें देहास दंडवितात. पण अशानें त्यांस मोक्ष होईल काय? सम्यग्दर्शनाशिवाय ही सर्व

खटपट व्यर्थ होय.

**ण हु दंडइ कोहाइं, देहं दंडइ कहं खवइ कम्मं ॥**
**सप्पा किं मुवइ तहा, वम्मीये मारए लोए ॥ ५७ ॥**

अर्थ— हे मूर्खा; तूं व्यर्थ आपला देह कां झिजवितोस? देहाचे ठिकाणीं वास करणारे जे क्रोध, मान, माया, लोभ वगैरे कषाय त्यांचा नाश कर. सापाचें घर ( वारुळ ) मोडून टाकिलें ह्मणून साप कधीं मेला आहे काय?

**उवसमतवभावजुदो, णाणी सो ताव संजदो होदी ॥**
**णाणी कसायवसगो, असंजदो होइ सो ताव ॥ ५८ ॥**

अर्थ— जोंपर्यंत कषाय शांत असतात तोंपर्यंत हा आत्मा ज्ञानी व संयमी होय. आणि पुष्कळ ज्ञान असूनहीं ज्याचे कषाय नष्ट झाले नाहींत तो अज्ञानी व असंयमीच होय.

**णाणी खवेइ कम्मं, णाणबलेणिदि सुबोल्लए अण्णाणी ॥**
**वेज्जा भेसज्जमहं, ण जाणदे णस्सदे वाहिं ॥ ५९ ॥**

अर्थ— ज्ञानी ज्ञानबलानें कर्मांचा क्षय करितो तसा अज्ञानी पुष्कळ देह झिजवूनहि करूं शकणार नाहीं. निदान, चिकित्सा वगैरे ज्यास कळत नाही अशा वैद्याच्या हातून व्याधि हटेल काय?

**पुव्वं सेवइ मिच्छामलसोहणहेउ सम्मभेसज्जं ॥**
**पच्छा सेवइ कम्मामयणासणचारियसम्मभेसज्जं ॥ ६० ॥**

अर्थ— रोगनिवारणार्थ औषध घ्यावयाचें असल्यास, प्रथम जसें ढाळक वगैरे घेऊन मल साफ करितात; तसें कर्मरूपी रोग नाहींसा करण्याकारितां; प्रथम मिथ्यात्वरूपी मलाचा नाश करण्यास सम्यग्दर्शन-रूपी औषध सेवन करावें. आणि मग सम्यक्चारित्ररूपी काढा घ्यावा.

**अण्णाणी विसयविरत्तादो होइ सयसहस्सगुणो ॥**

**णाणी कसायविरदो विसयासत्तो जिणुद्दिट्ठं ॥ ६१ ॥**

अर्थ— ज्यानें पंचेंद्रियविषयांचा त्याग केला आहे अशा अज्ञानी मनुष्यापेक्षां; पंचेंद्रियविषयासक्त असूनही जो क्रोधादिकषायांस जिंकून शांत भावानें रहातो असा ज्ञानी पुरुष शतपटीनें अथवा सहस्रपटीनें श्रेष्ठ होय.

**विणवो भत्तिविहीणो, महिळाणं रोहणं विणा णेहं ॥**
**चागो वेरग्गविणा, येदे दोव्वारिया भणिया ॥ ६२ ॥**

अर्थ— भक्तीवांचून विनय करणें, स्नेहाशिवाय स्त्रियांवर सत्ता चालविणें हें जसें पोकळ, तसेंच उपरति ( वैराग्य ) झाल्याशिवाय पंचेंद्रियविषयादिकांचा त्याग करणें हें पोकळ होय. असंभाव्य होय.

**सुहडो सूरत्तविणा, महिला सोहग्गरहियपरिसोहा ॥**
**वेरग्गणाणसंजम-हीणा खवणा ण किं पि लब्भंते ॥ ६३ ॥**

अर्थ— अंगी शूरत्व असल्याशिवाय कोणासही जसे सुभट ह्मणतां येत नाहीं; किंवा पतिसौभाग्याशिवाय स्त्रीस जशी शोभा नाहीं; तद्वतच वैराग्य, ज्ञान, संयम वगैरे सद्गुणांशिवाय यति शोभत नाहीं.

**वत्थुसमग्गो मूढो, लोही लब्भइ फलं जहा पच्छा ॥**
**अण्णाणी जो विसयासत्तो लहई तहा चेव ॥ ६४ ॥**

अर्थ— लोभी व मूर्ख मनुष्यास धनधान्याची समृद्धि असूनही जसें निष्फळ, तद्वतच विषयासक्त व अज्ञानी अशा यतीचे कायक्लेश निष्फळ होत.

**वत्थुसमग्गो णाणी सुपत्तदाणे फलं जहा लहई ॥**
**णाणसमग्गो विसयपरिचत्तो लहइ तहा चेव ॥ ६५ ॥**

अर्थ— ज्ञानी मनुष्य धनधान्यादिकांनीं संपन्न असला ह्मणजे; तो जसा विवेकानें सत्पात्रदान स्वसंरक्षण वगैरे करून इहपरलोकीं सुख

भोगितो, तद्वतच ज्ञानसंपन्न मुनि विषयोपभोगांचा त्याग करून मनुष्य-जन्माचें सार्थक्य करितो

**भूमहिलाकण्णाईलोहाहिविसहरं कहिंप्पि हवे ॥**
**सम्मत्तणाणवेरग्गोसमत्तेण जिणुद्दिट्ठं ॥ ६६ ॥**

अर्थ— धन, धान्य, स्त्री, पुत्र, कन्या वगैरे वस्तूविषयीं लोभ रूपी सर्पाच्या दंशानें मूर्छित झालेल्या आत्म्यास सम्यग्दर्शन, ज्ञान. वैराग्य वगैरे मंत्रौषधीनें सावध करावें; असें जिनानें सांगितलें आहे.

**पुव्वं जो पंचिंदियतणुमणवचिहत्थपायमुंडहरो ॥**
**पच्छा सिरमुंडहरो सिवगइपहणायगो होई ॥ ६७ ॥**

अर्थ— ज्यानें प्रथम पंचेंद्रिय विषयांचा त्याग करून मनोमुंडन केलें आणि मग शिरोमुंडन केलें तोच संन्यासी मोक्षगतीस योग्य (समर्थ) होय.

**पदिभत्तिविहीण सदी भिच्चो जिणसमयभत्तिहीणो ॥**
**गुरुभत्तिहीण सिस्सो दुग्गइमग्गाणुलग्गवो णियदो ॥ ६८ ॥**

अर्थ— पतिसेवा न करणारी स्त्री, मालकाचा सन्मान न ठेवणारा चाकर, जिनेश्वर व जिनशास्त्रावर विश्वास न ठेवणारा जैन, गुरूची भक्ति न करणारा शिष्य हे सर्व खास नरकास जाणार.

**गुरुभत्तिविहीणाणं सिस्साणं सव्वसंगविरदाणं ॥**
**ऊसरखेत्ते ववियं सुबीयसमं जाण सव्वणुट्ठाणं ॥ ६९ ॥**

अर्थ— ऊपर जमिनींत पुष्कळ मेहनत करून जरी चांगलें बीं पेरिलें तरी त्यापासून जसा कांहींच उपयोग होत नाहीं, तद्वतच पुष्कळ व्रतानुष्ठान करीत असूनही गुरूचे ठायीं भक्ति जो करीत नाहीं; त्या शिष्यास यत्किंचितही फायदा होणार नाहीं.

**रज्जं पहाणहीणं पदिहीणं देसगामरत्थबलं ॥**
**गुरुभत्तिहीण सिस्साणुट्ठाणं विणस्सदे सव्वं ॥ ७० ॥**

अर्थ- –राज्यांत जर उत्तम प्रधान नाहीं, किंवा देश, पुर, ग्रामावर अधिकारी नाहीं आणि सैन्यावर जर त्याचा नायक नाहीं तर जसा नाश व्हावा; तद्वतच गुरूवर भक्ति नसलेल्या शिष्यांचें सर्व व्रतानुष्ठान नाश पावणार.

**सम्माणविणविणयरुई भत्तिविणा दाणं दयाविणा धम्मो ॥**
**गुरुभत्तिहीण तवगुणचारित्तं णिफळं जाण ॥ ७१ ॥**

अर्थ— योग्यतेशिवाय विनय, भक्तीशिवाय दान. दयेविना धर्म, व गुरुभक्तीशिवाय व्रत गुण चारित्र हीं सर्व निष्फळ होत.

**हाणादाणावियारविहीणादो बाहिरक्खसोक्खं हि ॥**
**किं तजियं किं भणियं किं मोक्खो ण दिट्ठं जिणुदिट्ठं ॥ ७२ ॥**

अर्थ— त्याज्य काय आणि ग्राह्य काय ह्यांचा विचार नसल्यामुळें बाह्येंद्रियसुखाचा जरी त्याग केला तरी; त्यास जिनोक्त मोक्षसुख प्राप्त होणार नाहीं. (ज्ञानाशिवाय वैराग्य निरुपयोगी होय.)

**कायकेळेसुववासं दुद्धरतवयरणकारणं जाणा ॥**
**तं णियसुद्दपरुइपरिपण्णं चेदिकम्मणिम्मूळं ॥ ७३ ॥**

अर्थ— कायक्लेश व उपवास हें दुर्धर तपश्चरणाचें कारण होय. हें तपश्चरण जर शुद्धात्म्याविषयीं भक्तीनें पूर्ण असलें तर त्या योगानें सर्व कर्मांचा समूळ नाश होतो.

**कम्मुण खवेइ जो परवम्हु ण जाणेइ सम्मउम्मुक्को ॥**
**अत्थू ण तत्थू ण जीवो लिंगण घत्तूण किं करई ॥ ७४ ॥**

अर्थ— ज्याला सम्यक्त्व नाहीं; जो कर्मक्षय करीत नाहीं; परब्रह्म जाणत नाहीं; असा मनुष्य यति वेष धरून तरी काय करणार? त्याचे परिश्रम व्यर्थ.

**अप्पाणंपि ण पेच्छइ ण मुणइ ण विसद्दहाइ ण भावेई ॥**
**बहुदुक्खभारमूळं लिंगं घेत्तूण किं करई ॥ ७५ ॥**

अर्थ— जो यति आत्मस्वरूपास जाणत नाहीं, ज्ञानी जनांनी सांगितलें तरी तें मानीत नाहीं, आणि कदाचित् मानिलें (जाणलें) तरी त्याचें मनन करीत नाहीं, अशा यतीचे कायक्लेश दुःखमूलकच होत. नुसत्या वेषानें काय होणार?

**जाव ण जाणइ अप्पा, अप्पाणं दुक्खमप्पणो ताव ॥**
**तेण अणंतसुहाणं, अप्पाणं भावए जोइ ॥ ७६ ॥**

अर्थ— हे यते; जोंपर्यंत तुला अनंतसुखज्ञानादिसंपन्न जो आत्मा त्याची ओळख झाली नाहीं, तोंपर्यंतच दुःख आहे असें जाणून अनंतसुखाची प्राप्ति होण्याकरितां त्याचे चिंतवन कर.

**णियतच्चुवलद्धिविणा, सम्मत्तुवलद्धि णत्थि णियमेण ॥**
**सम्मत्तुवलद्धिविणा, णिव्वाणं णत्थि णियमेण ॥ ७७ ॥**

अर्थ— निजात्मतत्त्वज्ञानाशिवाय आत्मविशुद्धिरूपी जें निश्चयसम्यक्त्व तें प्राप्त होत नाहीं, आणि सम्यक्त्व झाल्याशिवाय निर्वाणपद मिळत नाहीं. याकरितां आत्मतत्त्वविचार केला पाहिजे.

**साळविहीनो रावो, दाणदयाधम्मरहियगिहसोहा ॥**
**णाणविहीणतवो वि य, जीवविणा देहसोहं वा ॥ ७८ ॥**

अर्थ— किल्ल्याशिवाय राजा, दान आणि दयाधर्माशिवाय घर, जीव निघून गेल्यावर देह, हे जसे शोभत नाहींत; तद्वतच ज्ञानावांचून केलेलें तपश्चरण शोभत नाहीं. अर्थात् त्यापासून कांहीं फलनिष्पत्ति होत नाहीं.

**मक्खी सिलिम्मपडियो, मुवइ जहा तह परिग्गहे पडियो ॥**
**लोहियमूढो खवणो, कायकेलेसेमु अण्णाणी ॥ ७९ ॥**

अर्थ— शेंबडांत पडलेली माशी जशी मरून जाते, तसा लोभानें मूढ झालेला अज्ञानी यति परिग्रहांत पडून कायक्लेश करून व्यर्थ मरून

जाणार आहे.

**णाणब्भासविहीणो, सपरत्तच्चं ण जाणए किंपी ॥**

**झाणं तस्स ण होइ हु ताव ण कम्मं खवेइ ण हु मोक्खं ॥८०॥**

अर्थ— ज्यानें ज्ञानाचा अभ्यास केला नाहीं; त्यास स्वतत्त्व परतत्त्व कळत नाहीं. स्वतत्त्व ज्यास कळलें नाहीं; त्यास ध्यान करितां येत नाहीं मग त्याचा कर्मक्षय कसा व्हावा? आणि मोक्ष तरी कोठून होणार? याकरितां कर्ममुक्त होऊं इच्छिणाऱ्या हे यते; तूं सद्ज्ञानाचा अभ्यास कर.

**अज्झयणमेव झाणं, पंचेंदियणिग्गहं कसायंपि ॥**

**तत्तो पंचमयाले पवयणसारब्भासमेव कुज्जा हो ॥ ८१ ॥**

अर्थ— पंचमकालांत या भरतक्षेत्रांतील मनुष्यांस आत्मध्यान करण्याची शक्ति प्राप्त होत नाहीं; याकरितां त्यांनीं प्रवचनसारादिक शास्त्रांचा अभ्यास करून ज्ञान संपादन करावें. इंद्रियनिग्रह करावा. कषाय (क्रोधादिक) सोडावेत. म्हणजे ध्यान केल्याचें फळ येईल.

**पावारंभणिवित्ति, पुण्णारंभे पउत्तिकरणं पि ॥**

**णाणं धम्मज्झाणं, जिणभणियं सव्वजीवाणं ॥ ८२ ॥**

अर्थ— ज्याला म्हणून संसारमुक्त होण्याची इच्छा आहे; त्यानें पापकृत्य सोडून पुण्य करावें. ज्ञानसंपादन करावें; धर्मध्यान करावें. असा सर्व जीवांस जिनाचा उपदेश आहे.

**सुदणाणब्भासं जो, ण कुणइ सम्मं ण होइ तवयरणं ॥**

**कुव्वंत्तो मूढमई, संसारसुहाणुरत्तो सो ॥ ८३ ॥**

अर्थ— ज्यास सम्यक्त्व नाहीं; ज्यानें जिनशास्त्राचा अभ्यास केला नाहीं; आणि जो तपश्चरण करून कायक्लेशमात्र करितो असा जो यति तो मूर्ख होय. त्याचे हे प्रयत्न संसारांतील नश्वरसुख भोगण्याकरितांच होत.

**तच्चवियारणसीलो मोक्खपहाराहणसहावजुदो ॥**

अणवयरं धम्मकहा–पसंगओ होई मुणिराओ ॥ ८४ ॥

अर्थ— आत्मतत्त्वाचा विचार आणि कर्ममुक्त होण्याकरितां प्रयत्न करणारा व निरंतर धर्मकथाप्रसंग करणारा जो मुनि; त्याचेच कायक्लेश सफल होतात. तो मुनिराज समजावा.

विकहाइविप्पमुक्को, आहोकम्माइविरहियो णाणी ॥
धम्मुद्देसणकुसलो, अणुपिहाणभावणाजुदो जोई ॥ ८५ ॥

अर्थ— जो विकथा ( स्त्रीकथा, राजकथा, चोरकथा, भंडकथा वगैरे ) करीत नाहीं; पचन (पाक, भस) वगैरे करीत नाहीं. आणि धर्मोपदेश करण्यांत कुशल असून द्वादशानुप्रेक्षा भावनामात्र करितो, तो ज्ञानी मुनि पूज्य होय.

णिंदावंचणदूरो, परिसहउवसग्गदुक्खसहमाणो ॥
सुहझाणज्झयणरदो, गयसंजोगो होइ मुणिराओ ॥ ८६ ॥

अर्थ— दुसऱ्याची निंदा न करणारा; कोणांसही न फसविणारा; भूक, तहान, थंडी, वारा इत्यादि परीषह आणि शत्रूनें केलेली पीडा सहन करणारा, निरंतर शुभध्यान ज्ञानाभ्यास वगैरे करीत असणारा आणि संपूर्ण परिग्रहापासून दूर राहणारा, यती पूज्य होय.

अवियप्पो णिद्दंदो, णिम्मोहो णिक्कळंकओ णियदो ॥
णिम्मळसहावजुत्तो, जोई सो होइ मुणिराओ ॥ ८७ ॥

अर्थ— जिनप्रणीत तत्त्वाविषयीं कधींही संशय न पावणारा, निःसंग निर्मोह, निष्कलंक, षडावश्यकादिक्रिया नियमितपणें चालविणारा, निष्कपटी, असा जो यति तोच श्रेष्ठ होय.

आतां मिथ्यात्वतपस्वीचें वर्णन करितात.

तिव्वं कायकिळेसं, कुव्वत्तो मिच्छभावणाजुत्तो ॥
सव्वण्णुवएसेसो, णिव्वाणसुहं ण गच्छेई ॥ ८८ ॥

अर्थ— ज्याला तत्त्वश्रद्धानरूप सम्यग्दर्शन नाहीं असा मिथ्यादृष्टि तपस्वी, तीव्र कायक्लेश करूनही मोक्षास जाण्यास समर्थ होत नाहीं. त्याचे क्लेश व्यर्थ.

**रायाइमळजुदाणं, णियप्परूवं ण दिस्सए किंपि ॥**
**समळादरिसे रूवं ण दीसए जहा तहा णेयं ॥ ८९ ॥**

अर्थ— अरशांतून प्रतिबिंब दिसावें असा नियम आहे; पण तो आरसा मळकट असला तर त्यांतून प्रतिबिंब दिसणार नाही. तद्वतच आत्म्यास आत्मा ओळखितां येतो; पण रागद्वेषादि मलानें मळकट झालेल्या आत्म्यास आत्मा ओळखितां येणार नाहीं. याकरितां आत्मज्ञानाची इच्छा करणारानें रागद्वेष सोडून द्यावेत.

**दंडत्तयसल्लत्तमंडियमाणो असूयगो साहू ॥**
**भंडणचायणसीलो हिंडदि सो दीहसंसारे ॥ ९० ॥**

अर्थ— अनर्थदंड करणारा, मिथ्या माया निदान हीं शल्यें असणारा, असूयावान्, गप्पा करणारा, याचना करीत हिंडणारा असा जो यती तो दीर्घ संसारांत हिंडणार.

**देहादी अणुरत्ता विसयासत्ता कसायसंजुत्ता ॥**
**आदसहावे सुत्ता ते साहू सम्मउम्मुक्का ॥ ९१ ॥**

अर्थ— देहभोगादिकांची स्पृहा करणारे, विषयासक्त, क्रोधादिकषायसहित, आत्मस्वभाव न जाणणारे असे जे साधु; ते मिथ्यात्वी होत.

**आरंभे धणधण्णे, उवयरणे कखिया तहा सूया ॥**
**वयगुणशीलविहीणा कसायकलहप्पिया मुहुरा ॥ ९२ ॥**

अर्थ— शेतकी वगैरे आरंभ आणि धनधान्यसंग्रह करणारा, इंद्रियसुखोपभोगाची सामुग्री जवळ बाळगणारा, ईर्ष्यावान्, व्रतशीलचारित्रहीन, कषायी व कलहप्रिय असा जो साधू तो मूर्ख होय.

**संघविराहकुशीला, सच्छंदा रहिदगुरुकुला मूढा ॥**
**रायायिसेवया ते जिणधम्मविराहये साहू ॥ ९३ ॥**

अर्थ— जिनधर्मी चतुःसंघाचा द्वेष करणारे; स्वच्छंदपणें वागणारे, गुरुगृहांत न रहाणारे, राजेलोकांची आज्ञा पाळणारे, जिनधर्मास विरोध करणारे, असे जे साधू; ते मूर्ख होत.

**जोइस वेज्जा मंतो, हजीवणं वा य वस्सववहारं ॥**
**धणधण्णपडिगहाणं, समणाणं दूसणं होइ ॥ ९४ ॥**

अर्थ— ज्योतिष, वैद्यकी, मंत्र, उच्चाटन, वशीकरण, धनधान्यसंचय इत्यादि करणें, हें मुनिजनांस अत्यंत निंद्य (लांछनास्पद) होय.

**जोपावारंभरया, कसायजुत्ता परिग्गहासन्ता ॥**
**लोयव्ववहारपहुरा, ते साहू सम्मउम्मुक्का ॥ ९५ ॥**

अर्थ— पापारंभ करणारे, कषायी, परिग्रहासक्त, लोकांच्या व्यवहारांत पडणारे असे जे साधु ते मिथ्यात्वी होत.

**ण सहंति इदरदप्पं, थुवंति ये अप्पमाहप्पं ॥**
**जिब्भणिमित्तं कुणंति, ते साहू सम्मउम्मुक्का ॥ ९६ ॥**

अर्थ— लोकांनीं केलेला गर्व सहन न करणार, आपलीच प्रशंसा करणारे जिव्हेंद्रियवश होऊन वाईट पदार्थ खाणारे असे जे साधु, ते मिथ्यात्वी होत.

**आतां उत्तमयतीचें लक्षण सांगतात.**

**भुंजेइ जहालाहं लहेइ जइ णाणसंजमणिमित्तं ॥**
**झाणज्झयणणिमित्तं अणयारो मोक्खमग्गरवो ॥ ९७ ॥**

अर्थ— ज्ञान आणि संयम वाढविण्याकरितां, आणि ध्यानाध्ययन नीट चालण्याकरितां मोक्ष मार्गी असलेला साधु, वेळेवर मिळेल तसलें पण निर्दोष असें अन्न सेवन करितो.

**उयरग्गिसमणमक्खं, मक्खणगोयारसब्भपूरणभमरं ॥**
**णाऊण तप्पयारे, णिच्चेवं भुंजए भिक्खू ॥ ९८ ॥**

अर्थ-- चक्रास वंगण केल्याशिवाय गाडी जशी नीट चालत नाहीं; तद्वतच अन्न सेवन केल्याशिवाय हा देह सुरक्षित रहात नाहीं. ह्मणून जिनरूप धारण करणारा मुनि, भ्रमर जसा पुष्पांस त्रास न देतां लवकर रसपान करितो, त्याप्रमाणेंच श्रावकांस कोणत्याही प्रकारें व्याकुल न करितां त्याजपासून संतोषानें जें मिळेल तें, पण निर्दोष असें अन्न सेवन करितो.

**रसरुहिरमंसमेदट्ठियमज्झसुकिळमळमुत्तपूयकिमिबहुलं ॥**
**दुग्गंधमसुइचम्ममणिच्चमचेयणं पडणं ॥ ९९ ॥**
**बहुदुक्खभायणं कम्मकारणं भिण्णमप्पणो देहं ॥**
**तहेह धम्माणुट्ठाणकारणं चेदि पोसये भिक्खु ॥ १०० ॥**

अर्थ--- रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा, शुक्र, मल, मूत्र, पूय, नाना तऱ्हेचे किडे, दुर्गंध इत्यादि अशुचिद्रव्यांनीं भरलेलें आणि चर्माच्छादित असें हें शरीर नाशवंत आणि परकीय आहे. तथापि या शरीराच्या आश्रयानें धर्मानुष्ठान घडून आत्मा कर्ममुक्त होतो; ह्मणूनच साधुलोक याची कांहींशीं कींव बाळगतात. ममत्व करीत नाहींत.

**संजमतवझाणज्झयणाविणा ण गिण्हये पडिग्गहणं ॥**
**वेग्गे गेण्णइ भिक्खू ण सक्कदे वज्जिदुं दुक्खं ॥ १ ॥**

अर्थ--- जो सर्वपरिग्रह सोडून देऊन; वैराग्यभावसहित संयम, तप, ध्यान, अध्ययन, वगैरे कर्ममुक्त होण्याचें उपाय करीत नाहीं, तो मुनि, संसारदुःखापासून मुक्त होण्यास समर्थ होत नाहीं.

**कोहेण य कलहेण य, जायणसीलेण संकिलेस्सेहिं ॥**
**रुद्देणं य रोसेण य, भुंजइ किं वेत्तरो भिक्खु ॥ २ ॥**

अर्थ— जो मुनि निरंतर, क्रोध, कलह, हट्टधरणें, संक्लिष्टपरिणामांत रहाणें, रागकरणें, रात्रंदिवस पाहिजे तें खाणें याच क्रिया करीत असतो, त्यास व्यंतर ( पिशाच ) ह्मणावें कीं काय?

**देउत्तरणसरिच्छं, जाणिज्जा हो धरेइ जइ सुद्दो ॥**
**तत्तायसपिण्डसमं, भिक्खू तुह पाणिगयपिण्डं ॥ ३ ॥**

अर्थ— हे साधो; तुझ्या हस्तपुटामध्यें प्राप्त झालेलें अन्न दिव्य अमृतपिण्डासमान शीतल असो; किंवा तापविलेल्या लोखंडासमान दुःसह असो; पण तें जर निर्दोष असेल तर त्याविषयीं रागद्वेष न करित शांतपणें सेवन कर. बस्यावाईटाची कल्पना करूं नको.

**अविरददेसमहव्वइ, आगमरुइ तं वियारेण ॥**
**तच्चण्हूपत्तंतर-सहस्सणिदिट्ठं जिणवरिंदेहिं ॥ ४ ॥**

अर्थ— अविरतसम्यग्दृष्टीपेक्षां देशसंयत सहस्रपटीनें श्रेष्ट होय. देशसंयतापेक्षां महाव्रती मुनि सहस्रपटीनें श्रेष्ठ होय. अर्थात् उत्तमपात्र महाव्रती; मध्यमपात्र देशसंयत आणि जघन्यपात्र सम्यग्दृष्टि.

**उवसमणिरीहझाणज्झयणाइमहागुणा जहा दिट्ठा ॥**
**जेसिं ते मुणिणाहा उत्तमपत्ता तहा भणिया ॥ १०५ ॥**

अर्थ— ज्यांचे क्रोधादिक कषाय शांत झाले आहेत, जे निरीच्छ झाले आहेत व निरंतर ध्यानाध्ययन करण्यांत तत्पर असे जे मुनिराज; ते उत्तमपात्र होत. त्यांस दान दिल्यानें उत्तमभोगभूमि प्राप्त होते.

**ण विजाणइ जिणसिद्धरूवं तिविहे तहा णियप्पाणं ॥**
**जो तिव्वं कुणइ तवं सो हिंडइ दीहसंसारे ॥ ६ ॥**

अर्थ— जो यति, जिनसिद्धांचें स्वरूप जाणत नाहीं; ज्यास परमात्म्याची ओळख नाहीं; पण तीव्र कायक्लेशमात्र पुष्कळ करितो; तो सद्गतीस न पावतां, उलट संसारांतच पुनः पुनः हिंडेल.

**णिच्छयववहारसरूवं, जो रयणत्तयं ण जाणइ सो ॥**
**जं कीरइ तं मिच्छा-रूवं सव्वं जिणुद्दिट्ठं ॥ ७ ॥**

अर्थ— निश्चयरत्नत्रय आणि व्यवहाररत्नत्रय यांचें स्वरूप न जाणता ज्या कांहीं कायक्लेशादिक क्रिया केल्या जातात त्या सर्व मिथ्यात्वरूप होत.

**किं जाणिऊण सयळं, तच्चं किच्चा तवं च किं बहुळं ॥**
**सम्मविसोहिविहीणं, णाणतवं जाण भवबीयं ॥ ८ ॥**

अर्थ— संपूर्णतत्त्वांचें ज्ञान होऊनतरी काय उपयोग? अथवा पुष्कळ तीव्र कायक्लेश करून तरी काय होणार? ज्यास शुद्ध तत्त्वश्रद्धान (जीवादिपदार्थ, जिनेश्वर, निर्ग्रंथगुरु, जिनशास्त्र यांविषयीं निर्मळ पूज्यबुद्धि) नाहीं त्याचें ज्ञान व तपही संसारकारणच होय.

**वयगुणसीळपगीसहजयं च चरियं तवं छडावसयं ॥**
**झाणज्झयणं सव्वं सम्मविणा जाण भवबीयं ॥ ९ ॥**

अर्थ— व्रत, गुण, शील, क्षुधादिबाधासहन, चारित्र, तप, सहा आवश्यक क्रिया, ध्यानाध्ययन करणें हे सर्व गुण, अंगीं सम्यक्त्व नसल्यास संसारकारणच होत.

**खाइं पूजा लाहं, सक्काराइं किमिच्छसे जोई ॥**
**इच्छसि जइ परळोयं, तेहिं किं तुज्झ परळोयं ॥ १० ॥**

अर्थ— हे यते! तूं आपली जगात प्रसिद्धि व्हावी, आपणास लोकांनीं पूज्य मानावें, सर्वांनी आपला सत्कार करावा अशी इच्छा कां बाळगतोस? या सत्कारादिकानें काय परलोकसिद्धि होते?

**कम्मादविहावसहावगुणं जो भाविऊण भावेण ॥**
**णियसुद्दप्पा रुच्चइ तस्स य णियमेण होइ णिव्वाणं ॥ ११ ॥**

अर्थ— ज्ञानावरणादिक कर्मे हे आत्म्याचे विभावगुण (स्वकीय नव्हेत ते) होत; आणि शुद्धज्ञानदर्शन व अनंतमुखवीर्य हे स्वभावगुण होत;

प्रयत्न केला असतां विभावगुण काढून स्वभावगुणसहित आपणास होतां येतें. असा दृढनिश्चय करून आत्मतत्त्वावर ज्याची श्रद्धा बसली, त्यास निर्वाणपद नियमानें होणार.

**मूळुत्तरुत्तरुत्तरदव्वादो भावकम्मदो मुक्को ॥**
**आसवसंवरणिज्जरभेयं जाणेह किं बहुणा ॥ १२ ॥**

अर्थ-- हे यते; तुला फार सागून तरी काय उपयोग? याकरितां तूं इतकेंच लक्षांत ठेव की, आस्रव ह्मणजे नवीन कर्म येण्याचें द्वार; संवर ह्मणजे कर्म येणाऱ्या द्वाराचा प्रतिबंध, निर्जरा ह्मणजे संचित कर्माचा अंशाअंशानें नाश; या तीन तत्त्वांचें चांगलें परिज्ञान करून घेऊन, जो प्राणी मूल ह्मणजे अनादिकालापासून आत्म्याशीं संबद्ध असलेलें आणि उतरोत्तर ह्मणजे प्रत्येक जन्ममरणरूप संसारांत जे घडले; त्या समस्त द्रव्यभावप्रकारक कर्मापासून मुक्त झाला, तोच अनंतमुखज्ञानदर्शनवीर्य-संपन्न सिद्धात्मा अर्थात् स्वभावयुक्त आत्मा झाला असें जाण.

**विसयविरत्तो मुंचइ, विसयासत्तो ण मुंचये जोई ॥**
**बहिरंतरपरमप्पाभेयं, जाणेह किं बहुणा ॥ १३ ॥**

अर्थ— हे साधो; पंचेंद्रियविषयासक्त असलेला प्राणी कर्ममुक्त होत नाहीं; अर्थात् विषय ज्याचे सुटले तोच कर्ममुक्त होण्यास समर्थ होतो. याकरितां अन्तरात्मा, बहिरात्मा आणि परमात्मा यांचें स्वरूपज्ञान तूं करून घे.

**णियअप्पणाणज्झाणज्झयणसुहामियरसायणप्पाणं ॥**
**मोत्तूण क्खाणिसुहं जो भुंजइ सो हि बहिरप्पा ॥ १४ ॥**

अर्थ— निजशुद्धात्मध्यानाध्ययनरूप सुखामृतरसाचें प्राशन करावयाचें सोडून देऊन; जो पंचेंद्रियविषयांचें सेवन करितो; तो बहिरात्मा.

**किंपायफलं पक्कं विसमिस्सियमोदइंदवारुणसोहं ॥**

**जिब्भसुहं दिट्ठिपियं जह तह जाणक्खसोक्खं पि ॥ १५॥**

अर्थ— यत्ने; पिकलेलें विषवृक्षाचें फल किंवा विषमिश्रित लाडू अथवा पिकलेल्या सापशन्या हीं जशीं दिसण्यांत सुंदर आणि जिभेस गोड लागतात; परंतु परिणामीं प्राणहानि केल्याशिवाय सोडीतच नाहींत; त्याप्रमाणेंच पंचेंद्रियविषयांचा स्वभाव आहे, हें पक्कें समज.

**देह कळत्तं पुत्तं, मित्ताइ विहावचेदणारूवं ॥**
**अप्पसरूवं भावइ, सो चेव हवेइ बहिरप्पा ॥ १६ ॥**

अर्थ— या देहास आणि पुत्रमित्रकलत्रादिपरिवारास जो आपले असें मानितो; तो बहिरात्मा होय. वस्तुतः यांचा आत्म्याशीं कांहींच संबंध नाहीं.

**इंदियविसयसुहादिसु मूढमइ रमइ लहइ ण लहइ तं ॥**
**बहुदुक्खमिदि ण चिंतइ, सो चेव हवेइ बहिरप्पा ॥ १७॥**

अर्थ— जो मूढमति पंचेंद्रियादिसुखांत रममाण होतो आणि तें सुख न मिळाल्यास फार कष्टी होतो; पण त्यांत फार दुःख आहे हें ज्यांस कळत नाहीं, तो बहिरात्मा होय.

**जं जं अक्खाणसुहं तं तं तिव्वं करेइ बहुदुक्खं ॥**
**अप्पाणमिदि ण चिंतइ, सो चेव हवेइ बहिरप्पा ॥ १८ ॥**

अर्थ— पंचेंद्रियांस सुख होण्याकरितां जें जें कृत्य करावें; त्या सर्वांपासून आत्म्यास दुःख होणार; हें ज्यास कळत नाहीं तो बहिरात्मा होय.

**जस्सि अमेज्झमज्झे उप्पण्णाणं हवेइ तत्थेव रुई ॥**
**तह बहिरप्पाणं बाहिरिंदियविसयेसु होइ रुई ॥ १९ ॥**

अर्थ— विष्ठेंत उत्पन्न झालेल्या कृमिजीवांस विष्ठेमधेंच जसें सुख वाटतें; तसेंच बहिरात्म्यास बाह्येंद्रियविषयांत सुख वाटतें.

**सिविणे वि ण भुंजइ विसयाइं देहाइभिण्णभावमई ॥**
**भुंजइ णियप्परूवं सिवमुहरत्तो दु मज्झमप्पो सो ॥ १२० ॥**

अर्थ— देहादिक हे आत्मभिन्न होत असें जाणून; स्वप्नांत सुद्धां बाह्येंद्रिय विषयसुख न सेवणारा आणि मोक्षाविषयीं प्रीती करणारा असा जो आत्मा; तो अंतरात्मा होय.

**मलमुत्तघडव्व चिरं वासिय दुव्वासणं ण मुंचेई ॥**
**पक्खालियसंमत्तजलो वि य णाणावियेण पुण्णो वि ॥ २१ ॥**

अर्थ— मलमूत्रानें गच्च भरलेल्या घटामारखें हें शरीर वरून पाण्यानें किती धुतलें तरी स्वच्छ होईल काय? कधींही होणार नाहीं. ( अर्थात् गंगादितीर्थस्नानेंकरून आत्मा शुद्ध होत नाहीं ) तर शुद्ध सम्यग्दर्शनरूप जलानें धुवून ज्ञानमय अमृतानें भरलें पाहिजे. ह्मणजे हें शरीर स्वभावानेंच अशुचि आहे; पण ज्ञानदर्शनगुणानें शुद्ध होतें.

**सम्माइट्ठी पाणी, अक्खाण सुहं कहंपि अणुहवइ ॥**
**केण विणा परिहारण, वाहिणासणट्ठ भेसज्जं ॥ २२ ॥**

अर्थ— ज्ञानवान् सम्यग्दृष्टि श्रावक उदासीनपणानेंच पंचेंद्रियसुखाचा उपभोग करितो. त्यांत विशेष आसक्ति न ठेवितां नियमितपणें त्याचें सेवन करितो. इंद्रियांस उच्छृंखल होऊं देत नाहीं. औषध घेतल्याशिवाय रोग बरा होत नाहीं असें जर आहे तर आपण घेतलेंच पाहिजे हें जसें न्याय्य; तद्वतच श्रावकानें देह शांत होण्याकरितां थोडें थोडें विषयसेवन करावें. पण त्यांत कांहीं मर्यादा ठेविली पाहिजे.

**किं बहुणा हो तजि, बहिरप्पसरूवाणि सयळभावाणि ॥**
**भज मज्झिमपरमप्पवत्थुसरूवाणि भावाणि ॥ २३ ॥**

अर्थ— बहुत बोलून काय होणार? तुला सुखाची जर इच्छा असेल तर; बहिरात्मस्वभाव टाकून देऊन मध्यमपरमात्मस्वभावाची ( अंतरात्म-

स्वभावाची ) प्राप्ति करून घे.

**चउगइसंसारगमणकारणभूयाणि दुक्खहेऊणी ॥**
**ताणि हवे बहिरप्पा वत्थुसरूवाणि भावाणि ॥ २४ ॥**

अर्थ— चतुर्गतिभ्रमणरूप संसार वाढविण्यास कारणीभूत व दुःखमूलक पापकृत्यें करणारा जीव बहिरात्मा होय.

**मोक्खगइगमणकारणभूयाणि पसच्छपुण्णहेऊणि ॥**
**ताणि हवे दुविहप्पा वत्थुसरूवाणि भावाणि ॥ २५ ॥**

अर्थ— मोक्षप्राप्ति होण्यास कारणीभूत व पुण्यमय कृत्यें करणारा जीव अंतरात्मा किंवा परमात्मा जाणावा.

**दव्वगुणपज्जयेहिं, जाणइ परसमयससमयादिविभेयं ॥**
**अप्पाणं जाणइ सो सिवगइपहणायगो होई ॥ २६ ॥**

अर्थ— द्रव्य, गुण, पर्याय, स्वसमय, परसमय इत्यादि पदार्थज्ञानाचे सहाय्यानें परमात्म्याची ओळख ज्यानें करून घेतली; तो साधु मोक्षमार्गांत श्रेष्ठ होय.

**बहिरंतरप्पभेयं परसमयं भण्णये जिणिंदेहिं ॥**
**परमप्पासगसमयं, तं भेयं जाणए गुणट्ठाणे ॥ २७ ॥**

अर्थ— बहिरात्मा आणि अंतरात्मा असे दोन भेद परसमयाचे आहेत. आणि परमात्मा हा स्वसमय होय. याचें यथार्थज्ञान गुणस्थानशास्त्र वाचल्यानें होईल.

**मिस्सोत्ति य बहिरप्पा, तरतमया तुरीय अप्प जहण्णा ॥**
**सत्तीत्ति मज्झिमुत्तर, खीणुत्तर परमजिणसिद्धा ॥ २८ ॥**

अर्थ— मिथ्यात्व, सासादन आणि मिश्र या तीन गुणस्थानांत बहिरात्मस्वभावी जीव वास करितात. असंयत गुणस्थानापासून उपशांत गुणस्थानवासी जीव अंतरात्मस्वभावी होत. आणि क्षीणकषाय मुनि,

सयोगकेवली, अयोगकेवली व सिद्ध हे परमात्मस्वभावसंपन्न होत.

मूढत्तयमळत्तयदोसत्तयदंडगारवत्तयेहिं ॥
परिमुक्को जोई सो सिवगइपहणायगो होइ ॥ २९ ॥

अर्थ— देवमूढ, लोकमूढ आणि पाखंडिमूढ यांस मूढत्रय ह्मणतात. मिथ्या, माया आणि निदान यांस शल्यत्रय ह्मणतात. राग, द्वेष आणि मोह यांस दोषत्रय ह्मणतात. मनोदंड, वचनदंड आणि काय. दंड यांस दंडत्रय ह्मणतात. रसगारव, सातगारव आणि इष्टिगारव यांस गारत्रय ह्मणतात. या सगळ्या त्रयांनी रहित जो मुनि तो मोक्षमार्गांत श्रेष्ठ होय.

रयणत्तयकरणत्तयजोगत्तयगुत्तित्तयविसुद्धेहिं ॥
संजुत्तो जोई सो सिवगइपहणायगो होई ॥ १३० ॥

अर्थ— सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान आणि सम्यक्चारित्र यांस रत्नत्रय; अधःप्रवृत्ति, अपूर्व, आणि अनिवृत्ति यांस करणत्रय; मनोयोग, वचनयोग आणि काययोग यांस योगत्रय; मनोगुप्ति, वचनगुप्ति आणि कायगुप्ति यांस गुप्तित्रय अशी नांवें आहेत. या सर्व त्रयांनी सहित जो मुनि तो मोक्षमार्गाचा नायक होय.

बहिरब्भंतरगंथविमुक्को सुद्धोवजोयसंजुत्तो ॥
मूलुत्तरगुणपुण्णो सिवगइपहणायगो होई ॥ ३१ ॥

अर्थ— अंतर्बाह्यपरिग्रहांचा त्याग करून; अठ्ठावीस मूलगुण व चौऱ्यांशी लक्ष उत्तरगुण धारण केलेला आणि शुद्धज्ञानदर्शनोपयोगयुक्त असा जो मुनि तो मोक्षमार्गांत श्रेष्ठ होय.

जं जाइजरामरणं दुहदुट्ठविसाहिविसविणासयरं ॥
सिवसुहलाहं सम्मं संभावय सुणय साहये साहू ॥ ३२ ॥

अर्थ— हे साधो; जन्म जरा आणि मरणरूपी जो दुष्ट विषसर्प

त्याचा तत्काल नाश करण्यास समर्थ असें जें सम्यक्त्वरत्न, तें कसें आहे याची ओळख करून घे. मग निरंतर त्याची भावना कर; आणि तें साध्य करून घे. कारण, तें शिवसुखाचा लाभ करून देण्यास समर्थ आहे.

किं बहुणा हो देविंदाहिंदणरिंदगणहरिंदेहिं ॥
पुज्जा परमप्पा जे तं जाण पहाणं सम्मगुणा ॥ ३३ ॥

अर्थ— हे भव्या; तुला फार काय सांगूं! देवेंद्र, नागेंद्र, नरेंद्र आणि मुनींद्र आदिकरून जे महापुरुष, ते परमात्म्याची जी पूजा अर्चा वगैरे करितात, त्याचें मुख्यकारण एक सम्यक्त्वगुणच होय.

मुत्तो अदोसुळंमाचियदो तत्तो अग्गिसिखोपमो यज्जे ॥
भुंजइ ये दुस्सीला रत्तपिंडं असंयत्तो ॥ ३४ ॥
उवसमइ सम्मत्तं मिच्छत्तबळेण पिल्लतस्सचे ॥
परिवट्टंति कसाया अवसप्पिणीकालदोसेण ॥ ३५ ॥

अर्थ— या हुंडावसर्पिणीकालदोषानें दुःशील व मिथ्यात्वी तपस्वी तापलेल्या लोहपिंडासमान व अग्निशिखेसमान असें यज्ञहत पशूचें मांसपिंड भक्षण करितात! मिथ्यात्वबलानें त्यांस सम्यक्त्व होत नाहीं. आणि क्रोध मान माया लोभरूप चतुःकषायानें ते कर्मबद्ध होतात.

गुणवयतवसमपडिमादाणं जळगाळणं अणत्तमियं ॥
दंसणणाणचरित्तं किरिया तेवण्ण सावया भणिया ॥ ३६॥

अर्थ— आठ मूळगुण, बारा व्रतें, बारा प्रकारचें तप, समता, अकरा प्रतिमा. चार प्रकारचीं दानें; जलगालन, रात्रिभोजनत्याग, सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान, आणि सम्यक्चारित्र या त्रेपन्न गुणांनीं युक्त जो श्रावक, तो सर्वांत श्रेष्ठ होय.

णाणेण झाणसिज्झी झाणादो सव्वकम्मणिज्जरणं ॥
णिज्जरणफळं मोक्खसुहं णाणब्भासं तदो कुज्जा ॥ ३७॥

अर्थ— ज्ञानेंकरून आत्मध्यानाची सिद्धि होते, व आत्मध्यान केल्यानें कर्मांची निर्जरा होते. निर्जरेचें फल मोक्ष, या करितां तुम्ही ज्ञानाचा अभ्यास करा. कारण; मोक्षप्राप्तीस परंपरेनें मूळकारण ज्ञान हें होय.

**कुसळस्स तवो निवुणस्स संजमो सम्मपरस्स वेरग्गो ॥**
**सुदभावणेण तत्तिय तह्मा सुदभावणं कुणह ॥ ३८ ॥**

अर्थ— कुशलतेनें तप, निपुणतेनें संयम, व उपशम भावानें वैराग्य प्राप्त होतें. आणि हे तीनही गुण श्रुतभावनेनें प्राप्त होतात. याकरितां तुम्ही श्रुतभावना ( शास्त्राभ्यास ) करा.

**कालमणंतं जीवो मिच्छसरूवेण पंचसंसारे ॥**
**हिण्डदि न लहइ सम्मं संसारभ्भमणपारंभो ॥ ३९ ॥**

अर्थ— हा जीव मिथ्यात्वरूपामुळें द्रव्य, क्षेत्र, काल, भव, भावरूप पंचप्रकार संसारांत अनंतकाल हिंडत आहे. यास सम्यक्त्वलाभाशिवाय संसारभ्रमण सुटणार नाहीं.

**सम्मदंसणसुद्धं जावदुवल्भभते तदा दि सुही ॥**
**सम्मदंसणसुद्धं जाव ण लभते हि ताव दुक्खी ॥ १४० ॥**

अर्थ— संसारचक्राच्या फेऱ्यांत सांपडलेला हा जीव; मिथ्याभावामुळें दुःख भोगीत आहे. शुद्धसम्यक्त्व प्राप्त झाल्याशिवाय सुखी होणार नाहीं. जेव्हां सम्यक्त्वी होईल तेव्हांच सुखी होणार.

**किं वहुणा वचणेण दु, सव्वं दुक्खेव सम्मत्तविणा ॥**
**सम्मत्तेण विजुत्तं, सव्वं सोक्खेय जाण क्खु ॥ ४१ ॥**

अर्थ— हे प्राण्या; तुला किती सांगितलें तरी काय उपयोग? सम्यक्त्वावांचून जें जें करावें, तें तें सर्व दुःखकारक होय; आणि सम्यक्त्वपूर्वक जें करशील तें सर्व सुखकर जाण.

णिक्खेवणयप्पमाणं सद्दालंकारछंदलहियाणं ॥
नाटयपुराणकम्मं सम्मविणा दीहसंसारा ॥ ४२ ॥

अर्थ— हे प्राण्या; तूं किती जरी निक्षेपादिनय, व्याकरण, अलंकार, छंद, नाटक, पुराण वगैरे शास्त्रें शिकून विद्वान जहालास; तरी सम्यक्त्व-गुणाशिवाय त्या शहाणपणापासून संसारमुक्त होणार नाहींस. हें पक्कें लक्षांत ठेव.

वसइप्पडिमोवयरणे गणगच्छे समयसंघजाइकुले ॥
सिस्सपडिसिस्सछत्ते सुपजाईकप्पडे पुत्ते ॥ ४३ ॥
पिच्छे सच्छरणे इच्छासु लोहेण कुणइ ममयारं ॥
यावच्च अट्टरुद्दं ताव ण मुंचदि ण हु सोक्खं ॥ ४४ ॥

अर्थ— चैत्यालय, जिनप्रतिमा, उपकरणें, गण, गच्छ, संघ, शास्त्र जाति, कुल, शिष्य प्रतिशिष्य, विद्यार्थी, पुत्र, मित्र, शत्रु, वस्त्र, पिंछ कमंडलु, अंथरूण इत्यादि पदार्थांविषयीं जी ममत्वबुद्धि ( आपलें असें मानणें ) जोंवर सुटली नाहीं; तोंवर सुख व्हावयाचें नाहीं.

रयणत्तयमेव गणं, गच्छं गमणस्स मोक्खमग्गस्स ॥
संघो गुणसंघाओ, समयो खलु णिम्मलो अप्पा ॥ ४५ ॥

अर्थ— हे यते; सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान आणि सम्यक्चारित्र हा आपला गण ( गोतावळा ); मोक्षमार्गानें गमन करणें हा आपला गच्छ ( मार्ग ) मूलोत्तरगुणांचा समुदाय हाच संघ; आणि निर्मळ आत्मा हाच आपला समय असें समजून; बाह्य पदार्थांविषयीं इच्छा सोडून दे.

मिहिरो महंधयारं मरुदो मेहं महावणं दाहो ॥
वज्जो गिरिं जहा विणसिंजइ सम्मं तहा कम्मं ॥ ४६ ॥

अर्थ— ज्याप्रमाणें सूर्य अंधकारास, वायु मेघास, अग्नि वनास, वज्र पर्वतास नाहींसा करून टाकितो; त्याप्रमाणेंच सम्यक्त्वानें सर्व

कर्मांचा नाश होतो.

**मिच्छंधयाररहियमियमज्झम्मि य सम्मरयणदीवकळावं ॥**
**जो पज्जळइ पदिस्सइ सम्मं लोयत्तं जिणुद्दिट्ठं ॥ ४७ ॥**

अर्थ-- मिथ्यात्वांधकारानें व्याप्त अशा हृदयरूपी घरांत सम्यक्त्वरूपी रत्नदीपास जो प्रज्वलित करितो; तो लोकालोकस्वरूप पहाण्यास समर्थ होतो. असें जिनानें सांगितलें आहे.

**पवयणसारब्भासं परमप्पज्झाणकारणं जाण ॥**
**कम्मक्खवणणिमित्तं कम्मक्खवणेण होइ मोक्खसुहं ॥ ४८**

अर्थ— सर्वकर्मांचा समूल नाश करण्यास मुख्यकारण जें परमात्मध्यान; तें प्रवचनसाराच्या अभ्यासानें प्राप्त होतें. या करितां प्रवचनसाराचा अभ्यास करा. कारण कर्मनाश झाल्याशिवाय मोक्ष मिळत नाहीं.

**धम्मज्झाणब्भासं, करेइ तिविहेण भावसुद्देण ॥**
**परमप्पझाणजेट्ठो, तेणेव समइ कम्माणि ॥ ४९ ॥**

अर्थ— हे साधो; तूं मनवचनकायशुद्धिपूर्वक धर्मध्यानाभ्यास कर. तेणेंकरूनच परमात्मध्यानाची सिद्धि होऊन संपूर्ण कर्मांचा नाश होईल.

**जिणलिंगधरो जोई, विरायसंमत्तसंजदो णाणी ॥**
**परमोवेक्खाइरियो, सिवगइपहणायगो होइ ॥ १५० ॥**

अर्थ-- आत्मविशुद्धिमात्र जें वीतराग सम्यत्व, त्या गुणास पावलेला, संयमवान्, ज्ञानवान्, परमनिरिच्छ, दिगबर जिनवेषधारी असा जो यति, तो मोक्षपद पावण्यास योग्य होय.

**कामदुहिं कप्पतरुं चिंतारयणं रसायणं रसपुरुमं ॥**
**लद्धो भुंजइ सोक्खं जइच्छियं जाण तहा सम्मं ॥ ५१ ॥**

अर्थ— कामधेनु, कल्पवृक्ष, चिंतारत्न, रसायन यापासून जसें इच्छित सुख अनायासें प्राप्त होतें, तद्वतच सम्यक्त्वगुणापासून इच्छित-

सुख सहज प्राप्त होतें.

**सम्मण्णाणं वेरग्गतवोभावं णिरीहवित्तिचारित्तं ॥**

**गुणसीळसहावं उप्पज्जइ रयणसारमिणं ॥ ५२ ॥**

अर्थ— हा रयणसार ग्रंथ वाचल्यानें सम्यग्ज्ञान, वैराग्य, तपोभाव, निरिच्छवृत्ति, चारित्र इत्यादि सद्गुणांची प्राप्ति होते.

**अज्ज विसप्पिणि भरहे, धम्मज्झाणं पमादरहिदोत्ति ॥**

**हो दिट्ठि जिणुदिट्ठं, ण हु मण्णइ सोहु कुदिट्ठी ॥ ५३ ॥**

अर्थ— या अवसर्पिणी कालांत भरतक्षेत्रांतील जो मनुष्य, धर्मध्यानास साधनीभूत अशा ग्रंथांचें निरालसपणें पारायण करितो तो सम्यग्दृष्टि होय. आणि या शास्त्रास जो मानीत नाहीं; तो मिथ्यादृष्टि समजावा.

**गंथमिणं जो ण दिट्ठइ, ण हु सुणोइ ण हु पढई ॥**

**ण हु चिंतइ ण हु भावइ, सो चेव हवेइ कुदिट्ठी ॥ ५४ ॥**

अर्थ— जो मनुष्य, या रयणसार ग्रंथाचें अवलोकन, मनन, श्रवण, पठण, चिंतवन, भावना वगैरे कांहींच करीत नाहीं तोच मिथ्यादृष्टि होय.

**इदि सज्जणपूज्जं, रयणसारगंथं निराळसो णिच्चं ॥**

**जो पढइ सुणइ वण्णइ, भावइ पावइ सासयट्ठाणं ॥ ५५ ॥**

अर्थ— जो मनुष्य, सज्जनपूजित अशा या रयणसारग्रंथाचें आळस सोडून श्रवण, मनन, वर्णन करितो, तो खरोखरच शाश्वतस्थानास ( मोक्षास ) पावतो.

**आनन्दो ज्ञानमैश्वर्यं वीर्यं परमसूक्ष्मता ॥**

**एतदात्यन्तिकं यत्र स मोक्षो जिनशासने ॥ १ ॥**

अर्थ— आनंद, ज्ञान, ऐश्वर्य वीर्य आणि परमसूक्ष्मता हे जेथें शाश्वत ( अंतरहित ) आहेत, त्या स्थानास मोक्ष ह्मणावें. असें जिनवचन आहे.

# रयणसार समाप्त.

श्रीमत्परमगम्भीरस्याद्वादामोघलाञ्छनम् ॥
जीयात्त्रैलोक्यनाथस्य शासनं जिनशासनम् ॥१॥

हा रयणसार ग्रंथ भगवान् कुंदकुंद आचार्य यांणीं लिहिला आहे. याची संस्कृतटीका आह्मांस कोठें मिळाली नाहीं. कानडीटीकेवरून आह्मीं यथामति हें भाषांतर लिहिलें आहे. यांत आमच्या अज्ञानाच्या बऱ्याच चुका असतील. त्या विद्वज्जनांनीं शोधून आह्मांस कळविल्यास मोठा उपयोग होईल. भगवान् कुंदकुंद आचार्य यांणीं लिहिलेले आणखी बरेच ग्रंथ आहेत; ते आह्मीं बोधकांतून क्रमानें प्रसिद्ध करणार आहों. त्यांतच एकदा आचार्यांचें चरित्र प्रसिद्ध करण्याचा हेतु आहे. तो आमच्या श्रद्धाळु वाचकांच्या पुण्यॆंकरून पूर्ण होवो.

कलापा भरमापा निटवे.

वैशाख शुद्ध ३ शके १८२९.

